**महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांना प्रवास भत्ता व विमान प्रवास संदर्भातील अनुज्ञेय सवलती (Entitlements) बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः भाप्रसे १५१६/प्र.क्र. २८८/२०१६/९**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २६.०४.२०२२

**वाचा-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. प्रवास १०१०/प्र.क्र. २/सेवा ५, दिनांक ३.३.२०१०
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. प्रवास १०१०/प्र.क्र. २/सेवा ५, दिनांक २३.६.२०१०
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. प्रवास १०११/प्र.क्र. १/सेवा ५, दिनांक २१.०१.२०११
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. प्रवास २०११/प्र.क्र. २९/सेवा ५, दिनांक २१.०१.२०१२
५) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. भाप्रसे १०१२/प्र.क्र. ९३(एन)/२०१२/९, दि. २६.११.२०१२
६) वित्त विभाग, अधिसूचना क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र.२३/सेवा-६, दि. १८.०४.२०१७
७) केंद्र शासन, वित्त मंत्रालय, व्यय विभाग, ज्ञापन क्र. एफ क्र. १९०३०/३/२००८-ई.IV, दि. २३.०९.२००८
८) केंद्र शासन, वित्त मंत्रालय, व्यय विभाग, ज्ञापन क्र. एफ क्र. १९०३०/१/२००७-ई.IV, दि.१३.०७.२०१७
९) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक भाप्रसे १५१६/प्र.क्र.२८८/२०१६/९, दि.०१.०१.२०१८

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र संवर्गात कार्यरत असलेल्या अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांना अ.भा.से. (प्रवास भत्ता) नियम, १९५४ नुसार प्रवास भत्ता अनुज्ञेय आहे. सदर नियमातील नियम क्र. ३ (१) नुसार अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांच्या प्रवास भत्त्यांचे नियमन राज्य शासनाच्या योग्य त्या नियमांन्वये करण्यात येईल असे विहित करण्यात आले आहे. तद्नुषंगाने सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र. ५ येथे नमूद दि. २६.११.२०१२ च्या शासन निर्णयानुसार महाराष्ट्र संवर्गात कार्यरत अखिल भारतीय सेवेतील (भाप्रसे/भापोसे/भावसे) अधिकाऱ्यांना वित्त विभागाच्या उपरोक्त संदर्भ क्र. १ ते ४ येथे नमूद शासन निर्णयांनुसार प्रवास भत्ता मंजूर व अदा करण्यात येतो. महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिका-यांना सहाव्या वेतन आयोगाप्रमाणे प्रवासभत्ता, बदली प्रवास भत्ता व विमान प्रवास संदर्भातील सवलती उपरोक्त संदर्भ क्र.९ नुसार अनुज्ञेय करण्यात आल्या आहेत.

केंद्र शासनाकडील अधिकारी/कर्मचाऱ्यांना ७ व्या वेतन आयोगानुसार संदर्भ क्र. ८ येथे नमूद दि. १३.०७.२०१७ च्या ज्ञापनातील तरतुदींनुसार प्रवास भत्ता व बदली प्रवास भत्ता अनुज्ञेय करण्यात आला आहे.

महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांना शासकीय/ न्यायालयीन कामानिमित्त विमान प्रवासाव्यतिरिक्त इतर मार्गाने प्रवास करावयाचा असल्यास तात्काळ आरक्षण मिळविण्यात येणाऱ्या

अडचणी, तातडीच्या कामासंदर्भात संबंधीत ठिकाणी हजर होतेवेळी होणारा उशीर व वेळेचा अपव्यय टाळण्याकरीता केंद्रशासनाकडील अ.भा.से. अधिकाऱ्यांप्रमाणेच प्रवास भत्ता व विमान प्रवासाबाबतच्या सवलती अनुज्ञेय करणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय –**

महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांना प्रवास भत्ता व विमान प्रवास संदर्भातील सवलती (Entitlements) खालीलप्रमाणे लागू राहतील:-

अ) अखिल भारतीय सेवेतील वेतन मॅट्रीक्स स्तर (लेवल)-१० (रु. ५६१००-१७७५००) मधील परिविक्षाधीन अधिका-यांना परिविक्षाधीन कालावधीत केंद्र शासनातील अखिल भारतीय सेवेतील सदर वेतन मॅट्रीक्स स्तर (लेवल) मधील अधिका-यांप्रमाणे सातव्या वेतन आयोगाच्या दराने प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील.

ब) वेतन मॅट्रीक्स स्तर (लेवल) -११ ( Level-११) रु.६७७००-२०८७००, वेतन मॅट्रीक्स स्तर (Level-१२) रु.७८८००-२०९२०० व वेतन मॅट्रीक्स स्तर (Level-१३) रु.१२३१००-२१५९०० या वेतन मॅट्रीक्स स्तर मधील किंवा जबाबदारीच्या पदावर कार्यरत असणा-या विभाग प्रमुख दर्जाच्या अखिल भारतीय सेवेतील अधिका-यांना (संदर्भ क्र.६ येथे नमूद अधिसूचनेन्वये विभाग प्रमुख म्हणून मानावयाच्या अधिका-यांच्या यादीनुसार) ज्या ठिकाणी रस्ते / रेल्वेने लागणारा प्रवासाचा कालावधी हा ३०० कि.मी. पेक्षा जास्त आहे अशा ठिकाणी विभागाच्या सचिवांच्या अथवा विभागीय आयुक्तांच्या पूर्वपरवानगी शिवाय इकॉनॉमी क्लासने विमान प्रवास अनुज्ञेय राहील

क) केंद्रीय प्रतिनियुक्तीवरून परत येताना/ प्रत्यावर्तनानंतर राज्य शासनाच्या सेवेत रुजू होणा-या अखिल भारतीय सेवेतील अधिका-यांना बदली नंतर देय असलेला बदली प्रवास भत्ता तसेच महाराष्ट्र संवर्गामधून निवृत्त झाल्यानंतर अन्य राज्यात नवीन निवासी पत्त्यावर कायमचे वास्तव्य करणा-या अखिल भारतीय सेवेतील अधिका-यांस केंद्र शासनातील अधिका-यांप्रमाणे सातव्या वेतन आयोगाच्या दराप्रमाणे संयुक्त बदली अनुदान (Transfer Grant & Packaging Allowance) अनुज्ञेय राहील.

२. सदर शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून अंमलात येईल.

३. उपरोक्त तरतूदींव्यतिरिक्त वित्त विभागाच्या दि. ०३.०३.२०१० च्या शासन निर्णयातील अन्य तरतूदी अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांना या पुढेही लागू राहतील.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.११/२०२२/सेवा-५, दि. २४.०२.२०२२ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४२६१८०८३३०२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने**,**

SUJATA MANOJ SAUNIK

Digitally signed by SUJATA MANOJ SAUNIK
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=04f6ff0d1ef522f4e19358cfac66e30d146fa47249c32a356455a756d05ec1a9, pseudonym=0F4316152AE9704C9E34CC2EF2A8EB14A7151070, serialNumber=F49173DCDA3F795FF41A69777F5A6C2DED24F621CD434ABBB169565D1ABDAA1F, cn=SUJATA MANOJ SAUNIK
Date: 2022.04.26 18:10:18 +05'30'

**(सुजाता सौनिक)**
**अपर मुख्य सचिव (सेवा), महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
३) सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४) मा.विरोधी पक्ष नेता विधानसभा/विधान परिषद/विधानमंडळ, मुंबई-३२
५) सर्व सन्माननीय विधानसभा व विधानपरिषद सदस्य
६) अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव(वित्त), वित्त विभाग,मंत्रालय
८) प्रधान सचिव (व्यय),वित्त विभाग,मंत्रालय
९) प्रधान सचिव (ले.व को.),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
११) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१२) महालेखापाल(लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१३) मा.मुख्य सचिवांचे उपसचिव
१४) पोलीस महासंचालक आणि पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१५) प्रधान मुख्य वन संरक्षक, महाराष्ट्र राज्य ,पुणे
१६) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१९) सहाय्यक संचालक(लेखा), कार्यासन-९ अ, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
२०) सहाय्यक संचालक(लेखा), (भा.पो.से. कक्ष) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
२१) सहाय्यक संचालक(लेखा), (भा.व.से. कक्ष) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
२२) संबंधित अभासे अधिकारी कार्यरत असलेल्या कार्यालयांचे आहरण व संवितरण अधिकारी
२३) ( गृह विभाग/महसूल व वन विभाग/सामान्य प्रशासन विभागामार्फत )सर्व संबंधित अखिल भारतीय सेवेतील अधिकारी (गृह विभाग/महसूल व वन विभाग/सामान्य प्रशासन विभागामार्फत)
२४) गृह विभाग ( कार्यासन पोल-१), मंत्रालय, मुंबई
२५) महसूल व वन विभाग (भा.व.से. कार्यासन ), मंत्रालय, मुंबई
२६) वित्त विभाग (सेवा-५), मंत्रालय, मुंबई
२७) सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १०, १०अ व २६
२८) निवड नस्ती (कार्या. ९).